**सहकारी संस्थांसाठी अटल अर्थसहाय्य योजनेस सन २०२४-२५ करीता मुदतवाढ देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्र. संकिर्ण-०२२४/प्र.क्र.४९/१८-स,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक- २४ जून, २०२४

**वाचा:-**

१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण- १०१८/प्र.क्र.१२६/१८-स, दिनांक ०२/०१/२०१९.

२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. संकीर्ण-१११८/प्र.क्र.१२६/ १८-स, दिनांक २३/०१/२०१९.

३) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-०५१९/प्र.क्र.६६/१८-स, दिनांक १७/०६/२०१९.

४) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र. बैठक-१२२२/प्र.क्र. १९९/१८-स, दिनांक २३/०१/२०२३

५) महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ मर्या. यांचे पत्र क्र.जा.क्र.मसविम/अटल अर्थसहाय्य/मंजूरी आदेश/२१९८/२०२४, दिनांक १२.०२.२०२४

**प्रस्तावना :-**

राज्यातील सहकारी संस्थांच्या व्यवसाय / प्रकल्पांना अर्थसहाय्य देण्यासाठी " सहकारी संस्थांसाठी अटल अर्थसहाय्य योजना " या योजनेस वाचा येथील क्रमांक (१) व (२) अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र सहकार विकास महामंडळामार्फत करण्यात येत आहे.

सदर योजनेस मंत्रिमंडळाच्या दिनांक ०४.०६.२०१९ रोजी झालेल्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार वाचा येथील क्रमांक (३) अन्वये सन २०१९-२० या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली होती. तसेच सदर योजनेस वाचा येथील क्रमांक (४) अन्वये सन २०२०-२१, २०२१-२२, सन २०२२-२३ व सन २०२३-२४ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली आहे.

महाराष्ट्र सहकार विकास महामंडळ मर्या., पुणे यांनी वाचा येथील (५) अन्वये विषयांकित योजनेस सन २०२४-२५ करीता मुदतवाढ देण्याची शासनास विनंती केली होती. सदर प्रस्तावानुसार महामंडळाकडे उपलब्ध असलेला निधी दि.३१ मार्च, २०२४ पर्यंत खर्च होणे शक्य होणार नसल्याने सदर योजनेस सन २०२४-२५ मध्ये मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

“सहकारी संस्थांसाठी अटल अर्थसहाय्य योजना” ही योजना शासन निर्णय, दिनांक ०२.०१.२०१९ व शुध्दीपत्रक दि. २३.०१.२०१९ नुसार सन २०१८-१९ मध्ये लागु करण्यात आली

होती. सदर योजनेस शासन निर्णय दिनांक १७.०६.२०१९ अन्वये सन २०१९-२० मध्ये पुढे सुरू ठेवण्याकरीता मान्यता देण्यात आली आहे. तसेच दि.२३.०१.२०२३ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे सन २०२०-२१, २०२१-२२ व सन २०२२-२३ या वर्षांसाठी पूर्वलक्षी प्रभावाने आणि सन २०२३-२४ या वर्षासाठी पुढे सुरु ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात आली आहे.

या योजनेची अंमलबजावणी सन २०२४-२५ मध्ये पुढे सुरू ठेवण्यास तसेच सदर योजना ज्या स्वरुपात अंमलात होती त्याच स्वरुपात या योजनेची अंमलबजावणी करण्याकरीता शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने व त्यांचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४३१/२०२४/व्यय-२, दि.१९.०६.२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६२४१५१४१७६३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH ARUN PATIL

Digitally signed by SANTOSH ARUN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=ca78467bcc4594e1e11741a7962a7a83feafb176442575037160fc343c4ae5ab, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E52439642AB57C332B2A3E3E46F0D907BA6167409EF6D52C943BF775ECF042FD, cn=SANTOSH ARUN PATIL
Date: 2024.06.24 15:27:51 +05'30'

**( संतोष पाटील )**
**अपर निबंधक तथा सह सचिव**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२) मा.उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा. उप मुख्यमंत्री (नियोजन व वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ३२.
५) मा. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
६) मा. अपर मुख्य सचिव (सहकार व पणन), मंत्रालय, मुंबई ३२.
७) मा. प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
८) मा. प्रधान सचिव (व्यय ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
९) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे .
१०) विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था (सर्व)
११) कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) वित्त विभाग ( व्यय-२/ अर्थसंकल्प १३ कार्यासन), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती, कार्यासन १८-स.